**प्रकल्प बाधित मच्छिमारांकरीता नुकसान भरपाई देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या "राज्यव्यापी धोरणाचा" मसुदा अंतिम करणे व विविध मच्छिमार सहकारी संस्थाचे प्राप्त मागणी/निवेदनांबाबत योग्य निर्णय घेण्याकरीता मा.मंत्री (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखाली "उच्च स्तरीय समिती" गठित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मत्स्यवि- ११२१/प्र.क्र. १५२ भाग-२./ पदुम-१४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २२ मार्च, २०२२

**प्रस्तावना :-**

मरिआई मच्छिमार सहकारी संस्था मर्यादित, वाशीगांव, नवी मुंबई यांनी महाराष्ट्र राज्य व इतर विरुध्द ठाणे खाडी क्षेत्रात बांधण्यात येणा-या वाशी पूल प्रकल्पामुळे बाधित होणा-या मच्छिमारांना नुकसान भरपाई मिळण्यासंदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्रमांक २०१६/२०२१ दाखल करण्यात आली आहे. सदर रीट याचिकेबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी (१) अशा स्वरुपाच्या प्रकल्पामूळे बाधित होणा-या मच्छिमारांना नुकसान भरपाई देण्याच्या अनुषंगाने राज्यव्यापी धोरण विहित करावे (२) ठाणे खाडी पूल-३ या प्रकल्पामूळे बाधित होणा-या मच्छिमारांची नुकसान भरपाईबाबत समिती गठित करुन सदर समिती मार्फत नुकसान भरपाई ठरविण्यात यावी असे दि. १२/०८/२०२२ रोजी आदेशित केले आहे.

त्या अनुषंगाणे राज्याच्या किनारी भागात विविध यंत्रणामार्फत हाती घेण्यात येणा-या प्रकल्पांमुळे बाधित होणा-या मच्छिमारांना नुकसान भरपाई देण्यासाठी राज्यव्यापी धोरण तयार करण्याबाबत मा.प्रधान सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली आहे. सदर समितीने राज्यव्यापी धोरणाचा मसुदा तयार केला आहे."राज्यव्यापी धोरणाचा" मसुदा पारदर्शक बनविण्याकरिता विविध मच्छिमार सहकारी संस्थाचे विभागास निवेदन प्राप्त झाले आहेत.

तरी, प्रकल्प बाधित मच्छिमारांकरीता नुकसान भरपाई देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या "राज्यव्यापी धोरणाचा" मसुदा अंतिम करणे व प्राप्त मागणी व निवेदनांबाबत योग्य निर्णय घेण्याकरीता मा.मंत्री (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखाली "उच्च स्तरीय समिती" गठित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राज्याच्या किनारी भागात विविध यंत्रणामार्फत हाती घेण्यात येणा-या प्रकल्पांमुळे बाधित होणा-या मच्छिमारांना नुकसान भरपाई देण्यासाठी मा.प्रधान सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली गठित समिती मार्फत तयार केलेल्या "राज्यव्यापी धोरणाचा" मसुदा अंतिम करणे व विविध मच्छिमार सहकारी संस्थाचे प्राप्त मागणी व निवेदनांबाबत योग्य निर्णय घेण्याकरीता मा.मंत्री (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे "उच्च स्तरीय समिती" गठित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री, (मत्स्यव्यवसाय), | अध्यक्ष |
| २ | मा. राज्यमंत्री, (मत्स्यव्यवसाय), | उपाध्यक्ष |
| ३ | प्रधान सचिव/ सचिव, पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव/ सचिव ,महसुल विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव/ सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव/ सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव/ सचिव, वनविभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ८ | राष्ट्रिय समुद्री विज्ञान संस्था (NIO), अंधेरी यांचे प्रतिनिधी,<br>(महाराष्ट्र सागरी क्षेत्र नियमन प्रधिकरणाचे प्रतिनिधीत्व करणारे) | सदस्य |
| ९ | केंद्रिय सागरी मत्स्य संशोधन संस्था ( CMFRI ) यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १० | केंद्रिय मत्स्यकी शिक्षण संस्था (CIFE) यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ११ | भारतीय मत्स्यकी सर्वेक्षण ( FSI ) यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १२ | सहयोगी अधिष्ठाता, मत्स्य महाविद्यालय, रत्नागिरी,<br>डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १३ | सहयोगी अधिष्ठाता, मत्स्य महाविद्यालय, नागपुर,<br>महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपुर यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १४ | राष्ट्रिय पर्यावरण अभियांत्रीकी संशोधन संस्था (NEERI) मुंबई, यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १५ | टाटा इन्स्टिट्युट ऑफ सोशल सायन्स (TISS ), मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १६ | महाराष्ट्र सागरी क्षेत्र नियमन प्राधिकरण (MCZMA) यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १७ | महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, (MPCB) मुंबई, यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १८ | जवाहरलाल नेहरू पोर्ट ट्रस्ट (JNPT) यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १९ | तेल आणि नैसर्गिक वायु महामंडळ (ONGC) याचे प्रतिनिधी | सदस्य |
| २० | मुंबई पोर्ट ट्रस्ट (MbPT) याचे प्रतिनिधी | सदस्य |
| २१ | महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड (MMB) याचे प्रतिनिधी | सदस्य |
| २२ | उपाध्यक्ष आणि व्यवस्थापक संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,<br>(MSRDC) मुंबई, यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| २३ | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA) यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| २४ | शहर आणि औद्योगिक विकास महामंडळ (CIDCO) यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| २५ | किनारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई | सदस्य |
| २६ | आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहिल.

१. “राज्यव्यापी धोरणाचा” मसुदा अंतिम करणे

२. विविध मच्छिमार संस्थाचे “राज्यव्यापी धोरणाबाबत” प्राप्त होणारे निवेदन / मागण्या / उदभवलेल्या समस्या वर चर्चा करणे व तोडगा काढणे

३. घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाणे संबधित विभागास कार्यवाही साठी आदेशित करणे

४. संबधित विभागमार्फत करण्यात येणा-या कारवाई वर सनियंत्रण ठेवणे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असुन त्याचा संकेतांक २०२२०३२२१६१८१६२७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Shrinivas Jagannath Shastri

Digitally signed by Shrinivas Jagannath Shastri
DN: CN = Shrinivas Jagannath Shastri, C = IN, S = Maharashtra, O = Personal, T = 2388
Date: 2022.03.22 16:21:51 +05'30'

**( श्रीनिवास शास्त्री )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
६. अपर मुख्य सचिव, महसुल व वने विभाग, मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. प्रधान सचिव/ सचिव, (पदुम), मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. प्रधान सचिव/ सचिव, (पर्यावरण) , मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. प्रधान सचिव/ सचिव, (नगर विकास), मंत्रालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
१०. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. सह आयुक्त मत्स्यव्यवसाय (सागरी), महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२. प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, कोकण विभाग ,मुंबई
१३. महालेखपाल (लेखापरिक्षक/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१४. निवडनस्ती.